**श्री. गणेश प्रभाकर बेल्लाळे, उपनियंत्रक शिधावाटप, ई-परिमंडळ यांच्याकडे उपनियंत्रक शिधावाटप (अंमलबजावणी) या रिक्त पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक :- अतिका-३१२४/प्र.क्र.२११/ना.पु.१५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३० जुलै, २०२४.

**संदर्भ:-** १) महाराष्ट्र नागरी सेवा वेतन (नियम), १९८१ मधील नियम, ५६.
२) उपनियंत्रक शिधावाटप (मुंबई शिधावाटप यंत्रणा), सेवाप्रवेश नियम, २००० व (प्रथम सुधारणा), २०११.
३) शासन परिपत्रक, सा.प्र.वि., क्र.एस आरव्ही-२०१८/प्र.क्र.२०८/कार्या.१२, दि.०५.०९.२०१८.
४) शासन आदेश, अ.ना.पु.व ग्रा.सं.वि., क्र.प्रतिनि-२४२४/प्र.क्र.२१०/ना.पु.१५, दि.२५.०७.२०२४.
५) श्री. गणेश प्रभाकर बेल्लाळे, उपनियंत्रक शिधावाटप, ई-परिमंडळ यांचा अर्ज, दि.२५.०७.२०२४.

**प्रस्तावना :**

**१. शासन परिपत्रक, सा.प्र.वि., दि.०५.०९.२०१८ :**

सदर शासन परिपत्रकान्वये महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम ५६ नुसार शासकीय कर्मचाऱ्यांकडे अतिरिक्त कार्यभार सोपविताना विचारात घ्यावयाच्या मार्गदर्शक सूचना देण्यात आल्या आहेत.

**२. शासन अधिसूचना, अ.ना.पु. व ग्रा.सं.वि., दि.१७.१०.२००० व (प्रथम सुधारणा), दि.१५.०७.२०११ :**

सदर शासन अधिसुचनेन्वये मुंबई-ठाणे शिधावाटप यंत्रणेतील उपनियंत्रक शिधावाटप, गट-अ या पदाच्या सेवा प्रवेशाचे विनियमन करणारे नियम करण्यात आले आहेत.

**३. शासन आदेश, अ.ना.पु.व ग्रा.सं.वि., क्र.प्रतिनि-२४२४/प्र.क्र.२१०/ना.पु.१५, दि.२५.०७.२०२४ :**

सदर आदेशान्वये श्री. मधुकर बोडके, उपनियंत्रक शिधावाटप (अंमलबजावणी) यांची प्रशासकीय कारणास्तव उप आयुक्त, ठाणे महानगरपालिका या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात करण्यात आली असून त्यांच्या प्रतिनियुक्तीने मुंबई-ठाणे शिधावाटप यंत्रणेतील उपनियंत्रक शिधावाटप (अंमलबजावणी) हे पद रिक्त झाले आहे.

४. सबब, उपनियंत्रक शिधावाटप (अंमलबजावणी) या रिक्त झालेल्या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश**

१. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, दि.५.९.२०१८ अन्वये अतिरिक्त कार्यभार सोपविण्यासंदर्भातील मार्गदर्शक सूचना व तरतुदी विचारात घेऊन प्रशासकीय कारणास्तव मुंबई-ठाणे शिधावाटप यंत्रणेतील **श्री. गणेश प्रभाकर बेल्लाळे, उपनियंत्रक शिधावाटप, ई-परिमंडळ** यांच्याकडे **उपनियंत्रक शिधावाटप (अंमलबजावणी)** या रिक्त पदाचा **अतिरिक्त कार्यभार** सोपविण्यात येत आहे.

२. **श्री. गणेश प्रभाकर बेल्लाळे, उपनियंत्रक शिधावाटप, ई-परिमंडळ** यांनी **उपनियंत्रक शिधावाटप (अंमलबजावणी)** या **रिक्त** पदाचा अतिरिक्त कार्यभार तात्काळ धारण करावा.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७३०१४५८४६४९०६ असा आहे. सदर आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAMCHANDRA
KONDIBA DHANAWADE

Digitally signed by RAMCHANDRA KONDIBA DHANAWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=cf4fd1e4249e6612552db1552e149b0688899cac7ecc37ca9fbf60ec7d9103d6,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5B10EBD8BEE2E77F1E579C83AA5378F02AE01B1765CCDD10F83CB76CD8BBE016, cn=RAMCHANDRA KONDIBA DHANAWADE
Date: 2024.07.30 15:13:26 +05'30'

**( रामचंद्र धनावडे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
२) श्री. गणेश प्रभाकर बेल्लाळे, उपनियंत्रक शिधावाटप, ई-परिमंडळ .

**प्रत :-**

१) मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३) जिल्हाधिकारी, मुंबई.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१ /२, मुंबई /नागपूर.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, अ.ना.पु.व ग्रा.सं.वि., मंत्रालय, मुंबई.
७) निवडनस्ती, ना.पु.१५.